२०१५०४२३१५२७३९४३२७

(२८६)

मुरुगवाडी खारभूमी योजना ता.जि.रत्नागिरी या योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(२५७/२०१०) खारभूमी

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :-२८/०७/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/मुरुगवाडी/ तां-२(१) ३९८९, दि.८/६/२०१०

प्रस्तावना :-

मुरुगवाडी खारभूमी योजना ता.जि.रत्नागिरी, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट असून केंद्रीय पर्यावरण वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी १२९० मी. असून त्यावर सा.क्र.३९३ मी. वर १२५५ मि. दोन उघाडीचा समावेश आहे. सदर योजना रत्नागिरी तालुक्यात असुन अरबी समुद्राला लागुन आहे. सदर योजनेच्या संरक्षित क्षेत्रात मोठया प्रमाणावर खाजण झालेले असल्यामुळे शेतक-यांचे मोठे नुकसान होत आहे. यासाठी ही योजना होणे गरजेचे आहे. ही योजना तातडीने हाती घेण्याबाबत स्थानिक प्रतिनिधी कडून मागणी करण्यात आली आहे. तसेच स्थानिक लाभार्थींचा मागणी अर्ज आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये मुरुगवाडी खारभूमी योजना ता.जि.रत्नागिरी या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रू.३४,२८,७८७/- (रुपये चौथीस लक्ष, अठ्ठावीस हजार, सातशे सत्याएंशी फक्त) एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीत्त विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (४६/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यावसह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(२५०/२०१०) खारभूमी दिनांक ३/०६/२०११ चे सहपत्र
मुरुगवाडी खारभूमी योजना ता.जि.रत्नागिरी, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ०.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १५,१५,३९५.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | १५,६६,६९३.०० |
| ५ | 'के' इमारती | ०.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | ०.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ९,९९१.०० |
| ८ | 'पी' देखभाल | ०.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | २५,०००.०० |
| | एकूण | ३१,१७,०७९.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | ३,११,७०८.०० |
| | एकूण | ३४,२८,७८७.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | २३.०० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १,४९,०७८ |
| लाभव्यय गुणोत्तर | २.२५ |

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc